करार पध्दतीवरील नियुक्ती.
शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील
प्राध्यापक व सहयोगी प्राध्यापक.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एलईसी-२०२१/प्र.क्र.१९९/वैसेवा-३**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते. संकुल,
९ वा मजला, नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: ०९ फेब्रुवारी, २०२२.

**वाचा :-**

१) शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक - एमईएस-१५०८/प्र.क्र.९४/०८/वैसेवा-१, दिनांक ७/९/२०११
२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-संकीर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दिनांक १७/१२/२०१६

**प्रस्तावना :-**

तज्ञ व अनुभवी डॉक्टरांच्या कमतरतेमुळे व शासन सेवेत प्रवेश करण्याच्या त्यांच्या अनिच्छेमुळे अशा डॉक्टरांची शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील वरिष्ठ अध्यापकीय पदावर नियुक्ती करण्याची अडचण शासनास नेहमीच भासली आहे. विशेषत: चिकित्सालयीन व अतिविशेषोपचार विषयांबाबत ही समस्या गंभीर स्वरुपाची आहे. चिकित्सालयीन व अतिविशेषोपचार विषयातील डॉक्टरांना खाजगी व्यवसायातून चांगली अर्थप्राप्ती होत असल्याने त्यांचा शासन सेवेकडे फारसा कल नसतो. याचा विपरीत परिणाम विद्यार्थ्यांच्या हितावर व रुग्णसेवेवर देखील होत असतो. त्याशिवाय नियमित नियुक्त्यांसाठी कोणत्या ना कोणत्या कारणास्तव होणारा विलंब देखील या समस्येत भर टाकतो. त्यामुळे अशा वरिष्ठ अध्यापकीय पदांवर नियमित उमेदवार उपलब्ध होईपर्यंत करार पध्दतीने तात्पुरत्या नियुक्त्या करणे हा या समस्येवरील प्रभावी उपाय आहे. संदर्भ क्र.(१) येथील शासन निर्णयान्वये राज्यातील शासकीय वैद्यकीय, आयुर्वेद व दंत महाविद्यालयातील प्रध्यापक, गट-अ व सहयोगी प्राध्यापक, गट-अ या पदांवर करार पध्दतीने नियुक्त्या करण्याबाबतची कार्यपध्दती, अटी व शर्ती, मानधन इत्यादी बाबत तरतुदी करण्यात आल्या आहेत. अलीकडील काळात राज्यात अनेक ठिकाणी नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व संलग्नित रुग्णालयांची स्थापना करण्यात आली आहे. भविष्यात प्रत्येक जिल्ह्यात किमान एक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय स्थापन केले जाण्याची शक्यता आहे. त्याशिवाय अलीकडील काळात शासकीय वैद्यकीय महाविद्यालयांशी संलग्नित अतिविशेषोपचार रुग्णालयाची स्थापना करण्यात आली आहे. भविष्यात अशी आणखी अतिविशेषोपचार रुग्णालये स्थापन केली जाऊ शकतात. त्यामुळे शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील चिकित्सालयीन व अतिविशेषोपचार विषयातील प्राध्यापक व सहयोगी प्राध्यापक

पदांवर नियुक्त्यांबाबत अडचणी आणखी वाढणार आहेत. त्यामुळे संदर्भ क्र.(१) येथील शासन निर्णयातील तरतुदीमध्ये काळानुरुप योग्य ते बदल करुन करार पध्दतीने नियुक्त्यांबाबत सुधारित तरतुदी लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

(१) **व्याप्ती :-**

करार पध्दतीने नियुक्त्या करण्याबाबतच्या खालील सुधारित तरतुदी केवळ शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील व संलग्नित रुग्णालयातील चिकित्सालयीन व अतिविशेषोपचार विषयांतील प्राध्यापक, गट-अ व सहयोगी प्राध्यापक, गट-अ या पदांपुरत्या मर्यादित असतील.

**(२) निवडीची कार्यपध्दती :-**

(१) शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील व संलग्नित रुग्णालयातील चिकित्सालयीन व अतिविशेषोपचार विषयांतील प्राध्यापक, गट-अ व सहयोगी प्राध्यापक, गट-अ या पदावर करार पध्दतीने नियुक्तीसाठी त्या त्या पदावरुन सेवानिवृत्त झालेल्या अध्यापकांबरोबरच कोणत्याही वयोगटाचे राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोगाने निहीत केलेली आवश्यक अर्हता धारण करणारे खाजगी वा अन्य क्षेत्रातील उमेदवार (बिगर सेवानिवृत्त) पात्र असतील.

(२) करार पध्दतीने करण्यात येणा-या नियुक्त्यांकरिता आयुक्त, वैद्यकीय शिक्षण हे सक्षम असतील. सद्यस्थितीतील रिक्त पदे व नजीकच्या काळातील संभाव्य रिक्त पदे या आधारे संबंधित अधिष्ठाता पदांचे मागणीपत्र आयुक्तांना सादर करतील. आयुक्तांमार्फत त्या-त्या संस्थेसाठी राज्यस्तरावर व आयुक्तांच्या मान्यतेने संबंधित अधिष्ठातामार्फत स्थानिक स्तरावर रितसर जाहिरात एकाचवेळी प्रसिध्द करुन त्यास व्यापक प्रमाणात प्रसिध्दी देण्यात यावी. तसेच पात्र उमेदवारांच्या मुलाखती घेऊन गुणवत्तेनुसार उमेदवारांची निवड करण्यात यावी.

(३) पात्र उमेदवारांच्या निवडीसाठी आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, संबंधित संस्थेचे अधिष्ठाता व आयुक्त निश्चित करतील त्या संस्थेचे संबंधित विषयाचे विभागप्रमुख यांचा मुलाखत पॅनलमध्ये समावेश असेल. मुलाखतीबाबतचे अभिलेख जतन करुन ठेवण्यास आयुक्त जबाबदार असतील.

**(३) <u>अटी व शर्ती</u>** :-

संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णय दि.७/९/२०११ व संदर्भ क्र. (२) येथील शासन निर्णय दि. १७/१२/२०१६ मध्ये नमूद करण्यात आलेल्या खालील अटी व शर्ती या प्रकरणी देखील लागू राहतील.

(१) करार पध्दतीने नियुक्तीचा कालावधी हा नियमित उमेदवार उपलब्ध होईपर्यंत अथवा ३६४ दिवसांचा कालावधी यापैकी जे अगोदर घडेल इतका राहील.

(२) उमेदवाराचे कामकाज समाधानकारक नसल्यास, गंभीर स्वरुपाची अनियमितता व गैरवर्तणूक या कारणासाठी त्याची नियुक्ती कोणत्याही पूर्वसूचनेशिवाय संपुष्टात येईल.

(३) करार पध्दतीने नियुक्त उमेदवाराने प्रस्थापित मानकांनुसार अध्यापन, रुग्णसेवा व अधिष्ठाता यांनी नेमून दिलेली विवक्षित कामे पार पाडणे आवश्यक राहील.

(४) वरीलप्रमाणे विहीत कामकाज पार पाडल्यानंतर महाविद्यालयीन व रुग्णालयीन कर्तव्य व जबाबदा-यांवर विपरीत परिणाम होणार नाही याची दक्षता घेऊन उमेदवारास खाजगी वैद्यकीय व्यवसाय करण्याची मुभा राहील.

(५) करार पध्दतीवरील नियुक्त्या ह्या मंजूर आकृतीबंधातील रिक्त असणा-या पदांवरच करण्यात याव्यात.

(६) करार पध्दतीने नियुक्त उमेदवारांना नियमित नियुक्तीसाठी कोणताही हक्क राहणार नाही तसेच सदर कालावधी कोणत्याही सेवा प्रयोजनासाठी ग्राह्य धरला जाणार नाही.

(७) करार पध्दतीने नियुक्त उमेदवारास त्याच्या सेवा कालावधीत केवळ नैमितिक रजा अनुज्ञेय असतील.

(८) करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्तींनी त्यांना प्राप्त होणा-या कागदपत्रे/माहिती व आधारसामुग्रीबाबत गोपनीयता पाळणे आवश्यक राहील.

(९) करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्तींना कोणत्याही प्रकारचे प्रशासकीय व वित्तीय अधिकार प्रदान करता येणार नाहीत.

**<u>उपरोक्त अटी व शर्तींशिवाय खालील अटी व शर्ती याप्रकरणी नव्याने लागू राहतील:-</u>**

(१०) उमेदवाराच्या कामकाजाचे मुल्यांकन होणे आवश्यक आहे. यासाठी संबंधित विभाग प्रमुखानी दर तीन महिन्यांनी उमेदवाराच्या कामकाजाचा तपशीलवार आढावा स्वत:च्या अभिप्रायासह अधिष्ठाता यांना सादर करावा.

(११) संबंधित विषयाच्या पदव्युत्तर अथवा पदवी अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांकडून उमेदवाराच्या शैक्षणिक कामकाजासंदर्भात मुल्यांकन करण्याच्यादृष्टीने अभिमत (Feedback) घेण्यासाठी अध्यापन कौशल्य, वक्तशीरपणा, सचोटी इत्यादी निकषाच्या

आधारे निश्चित करण्यात आलेल्या दहा गुणांच्या प्रश्नावलीवर गुणांकन प्राप्त करुन घेणे आवश्यक राहील.

(१२) रुग्णसेवेसंदर्भात अभिमत (Feedback) घेण्यासाठी काही प्रसंगी रुग्णांकडून स्वतंत्र प्रश्नावलीच्या आधारे गुणांकन प्राप्त करुन घेणे आवश्यक राहील.

(१३) उमेदवाराचे काम समाधानकारक असल्यास व संस्थेची निकड असल्यास उमेदवारास प्रथम नियुक्तीचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर सेवेत तांत्रिक खंड देऊन पुढील ३६४ दिवसांकरिता पुनर्नियुक्ती देता येईल. तथापि अशा प्रकारच्या पुनर्नियुक्त्या उमेदवाराने त्याच्या वयाची ७० वर्षे पूर्ण केल्यानंतर कोणत्याही परिस्थितीत देय असणार नाहीत.

(१४) पुनर्नियुक्ती देण्यासाठी संबंधित विभाग प्रमुखानी अधिष्ठाता यांना स्वत:च्या अभिप्रायासह सादर केलेले तिमाही अहवाल तसेच प्रश्नावलीबाबतचे अभिलेख स्वत:च्या अभिप्रायासह अधिष्ठाता यांनी आयुक्त, वैद्यकीय शिक्षण यांना सादर करणे आवश्यक राहील. तिमाही अहवाल समाधानकारक असल्यास त्याचप्रमाणे दहा गुणांच्या प्रश्नावलीत उमेदवारास किमान आठ गूण प्राप्त होत असल्यास उमेदवारास आयुक्तांच्या मान्यतेने पुनर्नियुक्ती देता येईल.

(१५) उमेदवारास प्रथम नियुक्ती अथवा पुनर्नियुक्ती देण्यात आल्यानंतर किमान एक शैक्षणिक सत्र संपेपर्यंत त्यास कोणत्याही परिस्थितीत सेवा सोडता येणार नाही. तशा आशयाचे शपथपत्र उमेदवारास नियुक्तीपूर्वी सादर करणे बंधनकारक असेल. असे शपथपत्र सादर करणा-या उमेदवारासच करार पध्दतीने नियुक्ती देण्यात यावी. त्यामुळे शैक्षणिक सत्र चालू असलेल्या कालावधीत विद्यार्थीहित विचारात घेता उमेदवाराचा राजीनामा कोणत्याही परिस्थितीत स्वीकारला जाणार नाही.

(१६) बिगर सेवानिवृत्त गटातून करार पध्दतीने नियुक्त होणा-या अध्यापकाची नंतरच्या काळात नियमित नियुक्ती झाल्यास त्याला पूर्वीच्या सेवेचे कोणतेही लाभ अनुज्ञेय असणार नाहीत.

**<u>(४) मानधन</u>** :-

(i) **<u>सेवानिवृत्त अध्यापक</u>** :-

अशा अध्यापकांची करार पध्दतीने नियुक्ती झाल्यास त्यांना संदर्भ क्र. (२) येथील शासन निर्णय दिनांक १७/१२/२०१६ मधील तरतुदीनुसार दरमहा मानधन अनुज्ञेय असेल.

(ii) **<u>कोणत्याही वयोगटाचे आवश्यक अर्हता धारण करणारे खाजगी वा अन्य क्षेत्रातील उमेदवार (बिगर सेवानिवृत्त):-</u>**

अशा अध्यापकांची करार पध्दतीने नियुक्ती झाल्यास त्यांना खालीलप्रमाणे दरमहा मानधन अनुज्ञेय असेल.

**प्राध्यापक:-**

| अ.क्र. | पद | विषय | करार पध्दतीने दरमहा मानधन |
|---|---|---|---|
| १ | प्राध्यापक | चिकित्सालयीन-उर्वरित महाराष्ट्रातील संस्था | रु.१,८५,०००/- (रु. एक लक्ष पंचाऐंशी हजार केवळ) |
| २ | प्राध्यापक | चिकित्सालयीन-चंद्रपूर, गोंदिया, बारामती, नंदूरबार, धुळे, यवतमाळ, अंबाजोगाई, अलिबाग, सातारा, सिंधुदूर्ग, उस्मानाबाद या ठिकाणी स्थापन झालेल्या संस्था तसेच भविष्यात नगरपालीका व क व ड वर्गवारीतील महानगरपालीका या सारख्या दुरस्थ क्षेत्रात स्थापन होणाऱ्या संस्था | रु.२,००,०००/- (रु. दोन लक्ष केवळ) |
| ३ | प्राध्यापक | अतिविशेषोपचार | रु.२,३०,०००/- (रु. दोन लक्ष तीस हजार केवळ) |

**सहयोगी प्राध्यापक:-**

| अ.क्र. | पद | विषय | करार पध्दतीने दरमहा मानधन |
|---|---|---|---|
| १ | सहयोगी प्राध्यापक | चिकित्सालयीन-उर्वरित महाराष्ट्रातील संस्था | रु.१,७०,०००/- (रु. एक लक्ष सत्तर हजार केवळ) |
| २ | सहयोगी प्राध्यापक | चिकित्सालयीन-चंद्रपूर, गोंदिया, बारामती, नंदूरबार, धुळे, यवतमाळ, अंबाजोगाई, अलिबाग, सातारा, सिंधुदूर्ग, उस्मानाबाद या ठिकाणी स्थापन झालेल्या संस्था तसेच भविष्यात नगरपालीका व क व ड वर्गवारीतील महानगरपालीका या सारख्या दुरस्थ क्षेत्रात स्थापन होणाऱ्या संस्था | रु.१,८५,०००/- (रु. एक लक्ष पंचाऐंशी हजार केवळ) |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | सहयोगी प्राध्यापक | अतिविशेषोपचार | रु.२,१०,०००/- (रु. दोन लक्ष दहा हजार केवळ) |

उपरोक्त दरमहा मानधानाशिवाय इतर कोणतेही भत्ते वा आर्थिक लाभ उमेदवारास अनुज्ञेय असणार नाहीत.

५. याबाबत होणारा खर्च संबंधित लेखाशिर्षाखालील १०-कंत्राटी सेवा या उदिष्ठासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर आदेश हे निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू राहतील.

७. सदर आदेश दि.२७/०१/२०२२ रोजी संपन्न झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीतील निर्णयानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५७/२०२२/व्यय-१३, दिनांक ०९/०२/२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या त्या विभागाच्या सहमतीने तथा सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०८१५५८१४८६१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Saurabh Vijay

Digitally signed by Saurabh Vijay
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1881d2db26e7def23bb04e11d8b1bf15f88a57c4334fada0f815b878b0a2d44f, serialNumber=557b72c5074661cf936fc5c18380d6316697d92ad38676d79a0ba3cdd2cc8ee6, cn=Saurabh Vijay
Date: 2022.02.09 17:00:02 +05'30'

**(सौरभ विजय)**
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. मंत्री, वैद्यकीय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४. मा.राज्यमंत्री, वैद्यकीय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, विधानमंडळ, मुंबई,
७. सर्व मा. विधानमंडळ सदस्य,
८. उपसचिव, मा. मुख्यसचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
९. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई,
१०.संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई,
११.अधिष्ठाता, सर्व शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये,
१२.महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई, महाराष्ट्र-२ नागपूर,
१३.निवासी लेखापरीक्षाधिकारी, मुंबई,
१४.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१६.निवड नस्ती(वैसेवा-३)